सन १९९७–९८ या चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून २/३२ पो.सी. यार्न या कच्च्या मालाची खरेदी करण्यास मंजुरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक–बीजीटी–०१९८/५[२२]/पीआरएस–२.
मंत्रालय, मुंबई–४०० ०३२. दिनांक:– ३१ मार्च १९९८

वाचा:– १] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. एफसीटी/बजेट/१९९७–९८/कक्ष–६, दिनांक २४.३.९८ चे अर्धशासकीय पत्र.

शासन निर्णय:– बंद्यांचे पुनर्वसन व वस्तूंचे उत्पादन या दृष्टीने कारागृहात विविध वस्तूंचे उत्पादन कैद्यांकडून यंत्रावर करुन घेण्यांत येते. त्यानुसार वस्त्रोद्योग विभागात युनिफॉर्म कापडाचे उत्पादन करण्यांत येते. या युनिफॉर्म कापडाकरिता शासनाच्या विविध विभागांकडून तसेच इतर स्वायत्त संस्थाकडूनही बरीच मागणी आली आहे. ही युनिफॉर्म कापडाची मागणी पुरी करण्यासाठी २/३२ पो.सी. यार्न या कच्च्या मालाची आवश्यकता असून ती कच्चा माल मे. नरसिंग गिरजी मिल, सोलापूर या मिलकडून खरेदी करण्यांत येणार आहे. सदर मिल ही महाराष्ट्र राज्य व वस्त्रोद्योग महामंडळाची युनीट मिल असून हे महामंडळ शासनाचा अंगीकृत व्यवसाय आहे.

२. सन १९९७–९८ या आर्थिक वर्षासाठी "१०२ तुरुंग निर्मित वस्तू" या लेखाशीर्षाखाली आता रु.१,०४,००,०००/– [रुपये एक कोटी चार लाख फक्त] इतके अनुदान शिल्लक आहे. निविदा दरानुसार प्रस्तुतचे २/३२ पो.सी. यार्न खरेदी करण्याकरिता रु.८३,००,०००/– [रुपये त्र्याऐंशी लाख फक्त] इतका खर्च येणार आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता, २/३२ पो.सी. यार्न खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रु.८३,००,०००/– [रु.त्र्याऐंशी लाख फक्त] इतक्या खर्चास शासन या आदेशाद्वारे मंजुरी देत आहे.

४. प्रस्तावित खर्च "२०५६-तुरुंग–१०२–तुरुंग निर्मित वस्तू–३३ सामुग्री व पुरवठा [२०५६०१२४] [मागणी क्र.बी–७]" या लेखाशिर्षाखाली सन १९९७–९८ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागवावा.

५. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भाने क्र.सीआर–२६४/९८/व्यय–८, दिनांक ३०.३.९८ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ता.स.नाईक ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

महालेखापाल १/२, महाराष्ट्र [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१/२, महाराष्ट्र [लेखा परिक्षा] मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

वित्त विभाग, व्यय-८,

निवड नस्ती.